# चेहरा

- सुंदर चेहऱ्यासाठी
  उपाय
  *आरोग्य संवाद*
  * चेहऱ्यावर मुरूम पिंपल्स काळे डाग

  1)तुळस कडुनिंबाचा पाला बारीक करून लावा
  2 )निंबू संत्री मोसंबी  डाळींबाचा रस
  3)कोरफडीचे पाणाचे गर
  *जगातील सर्वात चांगले
  Face pack व moisturister
  4) पपई बिट गाजर टमाटा  काकडी या पैकी एका चा रस
  5) मुलतानी माती गुलाब जल
  6) दुधाची साय डाळींच पिठ व हळद
  7) दिवसात 3 वेळा चेहरा स्वच्छ पाण्याने धुवा
  dry scin
  ऑलीव्ह ऑईल
  तिळ तेल
  खोबरेतेल
  तुप
  मोहरी
  तेल या पैकी एक
  डोळ्याच्या बाजुचे काळे घेरे बटाट्याचा रस व बटाट्याचा काप करून डोळ्यावर ठेवा रात्रीच्या वेळी झोपण्या आगोदर .

# हिरडा

- हिरडा म्हणजे हरीतकी ही अतिशय महत्त्वाची वनस्पती आहे. सुरवारी हिरडा, बाळ हिरडा, रंगारी हिरडा असे याचे मुख्य प्रकार आहेत. नास्ती यस्य गृहे माता तस्य माता हरीतकी म्हणजे ज्याच्या घरी आई नाही त्याची काळजी हिरडा घेतो. इतके हिरड्याचे महत्त्व आयुर्वेदात वर्णन केलेले आहे.

भूक न लागणे, अन्न न पचणे, यावर बाळहिरडे खावेत. मलावष्टम्भावर हिरड्याचे चूर्ण रोज रात्री कोमट पाण्याबरोबर घ्यावे. मूळव्याधीच्या आजारात संडासाला खडा होणे, कुंथावे लागणे, यावर हिरडा घ्यावे, अम्लपित्तावर हिरडा चूर्ण तुपाबरोबर घ्यावे. खोकला, दमा, कफ, यावर हिरडा चूर्ण आणि पिंपळी चूर्ण मधातून चाटून खावे.

हिरडा हा डोळ्यांना फार उपयुक्त आहे. डोळे येणे, डोळ्यांना लाली, सूज, डोळ्यांना आग, डोळ्यांना पाणी येणे, या डोळ्यांच्या विविध विकारांवर सुरवारी हिरड्याच्या क्वाथाने डोळे धुवावेत. हिरडा, बेहेडा, आवळा, यापासून त्रिफळा चूर्ण तयार करतात. रोज रात्री १ चमचा त्रिफळा, १ चमचा मध, २ चमचे तूप असे सेवन केल्यास डोळ्यांचे तेज वाढते. चष्म्याचा नंबर कमी होतो. मध आणि तूप मात्र सम प्रमाणात असू नये. हरीतकी हे रसायन आहे. रोज हिरडा चूर्ण सेवन केल्याने शरीर निरोगी रहाते. बुद्धी तरतरीत रहाते. शरीराची प्रतिकारशक्ती वाढते. घाम जास्त येत असल्यास आंघोळीच्या वेळी अंगाला हिरडा चूर्ण लावावे. लहान मुलांना काही वेळा संडासाला होत नाही, कुंथावे लागते. अशा वेळी हिरडा पाण्यात उगाळून चाटवावा. दमा, उचकी लागणे यावर हिरडा, सुंठ गरम पाण्यातून घ्यावी. अजीर्ण, भूक न लागणे यावर सुरवारी हिरडा आणि सुंठ गरम पाण्यातून घ्यावी. कांविळीवर हिरड्याचा चांगला उपयोग होतो.

असा हा हिरडा अनेक व्याधींवर गुणकारी आहे

# लघवी

- *साडेतीन मिनिटे*

डॉक्टरांनी सांगितलेले -
ज्यांना अगदी  सकाळी अथवा रात्री झोपेत असताना  लघवीला जावे लागते अशांसाठी अतिशय महत्त्वाची सूचना -

प्रत्येकाने  अशावेळी साडेतीन मिनिटे जपायला हवे. हे इतके महत्वाचे का आहे ? ही साडेतीन मिनिटे अकस्मात मृत्यूची संख्या कमी करु शकतात. ज्या ज्या वेळी असे जेव्हा घडले त्या त्या वेळी शारीरीक दृष्टीने तंदुरुस्त असलेल्या व्यक्ती  रात्रीच मृत्यू पावल्या. अशा व्यक्तींच्या बाबतीत आपणास नेहमी ऐकिवात येते की कालच तर मी त्याच्याशी बोललो,  हा असा अचानक कसा वारला  ? याचे मुख्य कारण म्हणजे जेव्हा तुम्ही रात्री बाथरूमला जायला उठता तेव्हा तुम्ही ताबडतोब जाता.  आपण जेव्हा एकदम उभे राहतो तेव्हा मेंदूला रक्त पुरवठा होत नाही. ही साडेतीन मिनिटे अतिशय महत्त्वाची का असतात  ? मध्यरात्री जेव्हा तुम्ही त्वरित  लघवी करण्यासाठी जागे होता तेव्हा तुमचा ई.सी.जी. चा पॅटर्न बदलू शकतो. कारण एकदम उभे राहिल्याने मेंदूत रक्त पोचत  नाही व त्यामुळे ह्रदयक्रिया बंद पडते. साडेतीन मिनिटाचा सराव हा यावर उत्तम उपाय आहे आणि तो म्हणजे

1) झोपेतून उठतेवेळी पहिला अर्धा मिनिट गादीवर पडून राहा

2) पुढील अर्धा मिनिट गादीवर बसा

3) त्यानंतर पुढील अडीच मिनिटे गादीच्या काठावर बसून दोन्ही पाय खाली सोडा.

साडेतीन मिनिटानंतर तुमचा मेंदू रक्तावीना राहणार नाही व ह्रुदय क्रिया बंद पडणार नाही. त्यामुळे अकस्मात मृत्यूची संख्या देखील कमी होईल.

आपल्या परिचयातील स्नेहीजनांना या उपायाने लाभ व्हावा म्हणुन हा संदेश अधिकाधिक प्रसारित करा.
ţ ţ ţ ţ ţ

# किडणी

- किडनी म्हणजे मूत्रपिंड ...घ्यावयाची दक्षता
  ============================

  किडनीचे आजार किंवा किडनी फेल्योर संपुर्ण जगात खुप जलद वाढत आहे. भारतामध्ये प्रत्येकी 10 पैकी 1 मानसाला कोणत्याना कोणत्या रुपात क्रोनिक किडनीचा आजार होण्याची शक्यता असते. प्रत्येक वर्षी 1,50,000 लोक किडनी फेल्योरच्या शेवटच्या स्टेपचे रुग्ण असतात. ज्यामुळे त्यांना डायलिसिस किवा किडनी प्रत्योरपणाची आवश्यकता असते. परंतु आपल्या काही सामान्य सवयी या किडनीचे आरोग्य बिघडवण्यासा जबाबदार असतात. चला तर मग जाणुन घेऊया किडनीला खराब करणा-या सवयींविषयी...

  किडनीचे महत्त्व
  किड्न्या आपल्या शरीरातील विषारी रक्त आणि अनावश्यक पाण्याला बाहेर काढतात. यासोबतच सर्व टॉक्सिन्स मूत्राच्या माध्यमातून शरीरातून बाहेर काढण्यास मदत करते. जर किडनी चांगली नसेल, तर रक्त शुध्द होत नाही आणि आरोग्य खराब होते.

  सकाळी उठून लघवी न करणे
  रात्रभर मूत्राशियामध्ये संपुर्णपणे मूत्र भरते, ज्यामुळे ते सकाळी उठल्याबरोबरच रिकामे करणे आवश्यक असते. जर तुम्ही सकाळी लघवी करण्यास कंटाळा केला आणि खुप वेळ मूत्र त्याग केला नाही तर भविष्यात तुमच्या किडनीला त्रास होऊ शकतो.

  मिठाचे अति सेवन
  मीठ आपल्या भोजनाचा स्वाद वाढवते हे सत्य आहे, परंतु अधिक प्रमाणात याचे सेवन करणे वाईट परिणाम करु शकते. आपल्या भोजनाच्या माध्यमातून खाल्लेले 95 टक्के सोडियम मूत्राशया व्दारे मेटाबोलाइज्ड होते. यामुळे मीठाचे अनावश्यक रुपात अधिक प्रमाणात सेवन करणे मूत्राशयाची क्रियाशीलता वाढवून त्यांच्या शक्तीला क्षीण करते.

  कमी पाणी पिने
  कमी प्रमाणात पाणी पिण्याच्या सवयीमुळे किडनीला धोका पोहोचू शकते. पाणी कमी प्यायल्याने किडनी आणि मूत्रनलीकेत संक्रमण होण्याची शक्यता जास्त असते, ज्यामुळे पोषकतत्त्वाचे कण मूत्रनलीमध्ये पोहोचून लघवी निच-याला बाधा पोहोचवते. यासोबतच किडनीमध्ये स्टोन होण्याची शक्यता वाढते. यामुळे दिवसभरात कमीत कमी 2-3 लीटर पाणी पिने आवश्यक असते.

  अधिक प्रमाणात पेनकिलर घेणे
  डॉक्टरांचा सल्ला न घेता औषधी घेण्यापासुन दूर राहा. डॉक्टरांचा सल्ला न घेता मेडिकलमधून पेनकिलर घेऊन खाणे हे किडनीला धोका पोहोचवू शकते.

  धूम्रपान आणि तम्बाकू
  धूम्रपान आणि तम्पाकूच्या सेवनामुळे अनेक गंभीर समस्या होतात. परंतु यामुळे ऐथेरोक्सलेरोसिस रोग देखील होतात. ज्यामुळे रक्त नलीकेतील प्रवाह हळू होतो यीकारणाने किडनीची कार्यक्षमता कमी होते. यामुळे धूम्रपान आणि तंबाकूचा सेवन कमी करा.

  हाय बीपीच्या इलाजात निष्काळजीपणा
  उच्च रक्तदाब म्हणजेच हाय बीपीचा इलाज करण्यात निष्काळजीपणा करणे हे किडनीच्या समस्याचे मोठे कारण बनू शकते. यामुळे नेहमी योग्य वेळी बीपी चेक करुन नियंत्रित ठेवली पाहिजे. कारण हे क्रोनिक किडनीचे आजार होण्याचे दुस-या नंबरचे मोठे कारण आहे.

  शुगरच्या आजारात निष्काळजीपणा
  मधुमेहाचा आजार असणा-या 30 टक्के लोकांना किडनीचा आजार होतो आणि किडनीचा आजार असणा-या एक तृतीयांश लोकांना मधुमेह होतो. यावरुन समजते की, या दोन्ही आजारांचे एकमेकांशी संबंध आहे. यामुळे रक्तात साखरेचे प्रमाण नियंत्रित ठेवणे गरजेचे असते. यासोबतच खाण्या पिण्यावर नियंत्रण ठेवले पाहिजे.

  इतर नुकसान पोहचवणा-या सवयी
  किडनी खराब करण्यास अजून काही सवयी आहेत जसे की, परिपुर्ण आराम न करणे, सॉफ्ट ड्रिंक्स आणि सोडा जास्त घेणे, जास्त वेळ उपाशी राहणे किंवा अशुध्द भोजन करणे, हायपरटेंशनचा उपचार न करणे किंवा खुप जास्त मांस खाने अशा सवयी किडनीला नुकसान पोहोचवू शकता.

# पालेभाज्या

- *हिरव्या पालेभाज्या*
  हिरव्या पालेभाज्या असे नुसते नाव घेतल तरी मुलांच्याच काय पण मोठ्यांचे चेहेरे पण जरा तिरकेच होतात. कोणत्याही दुसऱ्या भाजीमध्ये नसतील एवढी पोषणतत्वे या पालेभाज्यांमध्ये असतात. हिरव्या रंगामध्ये जीवनसत्त्व अ, ब, क, ई जीवनसत्त्व आढळून येतात. यात लोह, खनिजे, झिंक मुबलक प्रमाणात असल्यामुळे डॉक्टर आपल्या रोजच्या जेवणात जास्तीत जास्त पालेभाज्यांचा वापर करा असे सांगतात. आपली निरोगी जीवनशैली बिनदिक्कतपणे चालू राहण्यासाठी आपुल्या शरीराला लोहाची जास्त गरज असते. रोजच्या जेवणामुळे ते आपल्याला मिळू शकत नाहीत. या भाज्यांमध्ये सर्वात जास्त फॉलिक असीडचे प्रमाण असल्यामुळे गरोदर बायकांना अतिशय उपयुक्त असतात. हे खनिज पदार्थ माणसाच्या शरीरात खूप महत्वाच्या भूमिका पार पाडत असतात. जास्त पालेभाज्या खाल्ल्याने शरीराला मेद कमी, तंतुमय पदार्थ जास्त मिळत असल्यामुळे आपल्याला वाढलेल्या रक्तदाबाचे प्रमाण कमी ठेवण्यास मदत करते, ह्रदय रोग ,कर्करोग, मधुमेह पासून वाचवतात. यामुळे जास्त वाढलेले वजन सुद्धा कमी होऊ शकते. वारंवार खाण्याचा मोह कमी होतो. आपण जास्त हिरव्या पालेभाज्या का खायला हव्यात याचे खाली थोडी कारणे दिलेली आहेत.
  *शरीरातील पाण्याची पातळी नियमित ठेवण्यासाठी* उन्हाळ्याच्या दिवसात सगळे आपल्याला सांगतात की पाणी भरपूर प्या नाहीतर कमी पाणी प्यायल्या मुळे डीहायड्रेशनचा धोका संभवू शकतो. पण हिरव्या पालेभाज्या पण खा असे म्हणणारा क्वचितच असतो. हिरव्या पालेभाज्यांमध्ये पाण्याचे प्रमाण जास्त असते ते खाल्ल्याने शरीरातील पाण्याची पातळी नियमित राखण्यास मदत होते.
  *मॅग्नेशियमचा स्त्रोत* संशोधनाने हे सिद्ध झाले आहे की अधिक गडद रंगाच्या पालेभाज्यांमध्ये मॅग्नेशियमचे प्रमाण अधिक असते. मानवी शरीरामध्ये मॅग्नेशियमचे महत्त्व खूप आहे. मॅग्नेशियमच्या कमतरतेमुळे अनेक व्याधींना आमंत्रण मिळते जसे अस्थमा, बेचैन होणे, हृदयरोग, स्नायु आखडणे. म्हणून नेहमी वरचेवर आपण मॅग्नेशियमची कमतरतेने ग्रस्त आहोत का हे सारखे तपासत राहावे.
  *दृष्टीची ताकद वाढवते* जीवनसत्त्व अ पुरेपूर असल्यामुळे डोळ्यांसाठी हे अतिशय उपयुक्त आहे. अगदी लहान वयापासूनच मुलांना हिरव्या पालेभाज्या खायला घातल्या तर चष्मा लवकर लागत नाही.
  *हाडांच्या मजबूतीसाठी* हिरव्या पालेभाज्यांत जास्त प्रमाणात जीवनसत्त्व "क" असल्याने आपली हाडांना, दातांना बळकटी मिळते. या जीवनसत्त्वमुळे ऑस्टोकॅल्सिनची उत्पत्ती होते ज्यामुळे हाडांना बळकटी प्राप्त होते. विशेषत: महिलांमध्ये हाडे वयाच्या ३० वर्षानंतर ठीसूळ होण्याचे प्रमाण वाढते आहे त्यांचा हिरव्या पालेभाज्या खाण्याचे प्रमाण वाढवले पाहिजे. म्हणुन हाडे बळकट करण्यासाठी अगदी लहान वयापासूनच पालेभाज्यांचा आहारात जास्त समावेश व्हायला हवा.
  *वजन योग्य राखण्यास मदत* वजन कमी करणे ही काही जादू नाही त्यामुळे एखाद्याने आपले वजन कमी करण्याचे ठरवले की त्याच्या खाण्याच्या तक्त्यामध्ये हिरव्या पालेभाज्यांचा समावेश असायला हवा. हिरव्या पालेभाज्यांमध्ये मेदाचे प्रमाण कमी असते आणि तंतुमय पदार्थ प्रमाण जास्त असते. त्यामुळे वजन अजिबात नाही वाढत. डब्बाबंद आणि प्रक्रिया केलेले अन्नपदार्थ खाण्यापेक्षा हिरव्या पालेभाज्या जास्त खाण्यात ठेवा. पुढील दृष्टीने हिरव्या पालेभाज्या खाणे केव्हाही हितावह आहे.
  *चांगले अन्टिऑक्सीडअंट* हिरव्या पालेभाज्या चवीला जरी चांगल्या लागत नसतील तरी आहारात त्यांचा समावेश हवाच. तुमच्या त्वचेच्या काही तक्रारी असतील तर त्या जीवनसत्त्व ई आणि क मुळे कमी होण्यास मदत होते. त्वचा प्रसाधनांवर हजारो रुपये खर्च करण्यापेक्षा पालेभाज्या आणून खाणे अतिशय कमी किमतीत होते. यामुळे आपली त्वचा मुळापासून चांगली आणि निरोगी होते खूप नितळ दिसते.
  *तरुण दिसण्यासाठी* मोठ्या मोठ्या त्वचेच्या शस्त्रक्रिया करून आपले वय लपवण्यापेक्षा हिरव्या पालेभाज्या खाऊन आपण तेच काम करू शकतो. हिरवा रंग उत्साहाचे प्रतिक आहे आणि हिरव्या पालेभाज्या खाल्ल्यानंतर ते एखाद्याच्या चेहेऱ्यावर लगेच दिसून येते.
  *गरोदर बायकांसाठी अतिशय चांगले* एक चांगली आई होऊन आपल्या उदरात वाढत असलेल्या जीवाला चांगले निरोगी जीवन देण्यासाठी प्रयत्नशील असते. आई होण्यापूर्वी या उदासवाण्या हिरव्या पालेभाज्या खाणे म्हणजे कंटाळवाणे काम तुम्हांला वाटेल. बाळंतपणात होणारा उच्च रक्तदाब, मधुमेह याने टाळता येऊ शकतो.
  *भरपूर लोहयुक्त* तुम्ही सध्या केस गळती पासुन त्रस्त असाल तर पालेभाज्या खायला सुरवात करा. शरीरातील लोहाच्या कमतरतेमुळे असे घडते. मुख्यत्वे करून पालकाच्या भाजीमध्ये भरपूर प्रमाणत लोह असते ज्याने हिमोग्लोबिनची रक्तातील पातळी वाढते.

# •काळे मीठ

===========

साधासोपा वाटणारा नि मातीतून मिळणारा हा पदार्थ बाजारात बर्यापैकी ठाण मांडून आहे. जगभरच्या कानाकोपर्यात तो विविध रुपात उपलब्ध असतो. हा पदार्थ पॅक करायला, वाहतूक करायला, साठवून ठेवायला सोपा असतो. जोपर्यंत त्याचे बाष्प वा पाण्याशी संपर्क येत नाही तोपर्यंत त्याला काही बाधा पोहचत नाही.

या नाना प्रकारच्या मीठांमध्ये सोडियमचे प्रमाण कमीजास्त असते. सोडियमचा तणाव व रक्तदाबाशी संबंध जोडलेला असतो. त्यामुळे मीठाचा माफक वापर आरोग्यदायी ठरतो.भारतात वापरल्या जाणार्या सल्फरयुक्त काळ्या मीठाला परदेशी मंडळी नाक मुरडतात. `कुजलेले अंडे' अशी संभावना करतात. त्याला तसं कारणही आहे. या काळ्या मीठात सोडियम सल्फेट व आयर्न सल्फाईड या रसायनासोबत (कुजक्या अंडय़ाचा वास असलेला) हायड्रोजन सल्फाईड हा वायूदेखील असतो. आता हायड्रोजन सल्फाईड वायू शरीराला बाधा पोहोचविणारा असला तरी तो शरीराच्या चयापचय क्रियेतूनदेखील निर्माण होतो. त्यामुळे अल्प प्रमाणातले त्याचे अस्तित्व फारसे इजा पोहोचविणारे नसते. एरव्ही कांदा, हिंग यातदेखील त्याचे अस्तित्व असतेच ना!

समतोलपणे केलेला काळ्या मीठाचा वापर खूपच स्वादिष्ट असतो. चाट मसाल्यात तर हे काळे मीठ सर्रासपणे आढळते. पाचव्या-सहाव्या शतकातील वैद्यकतज्ञ चरक आणि सुश्रूथ यांनी काळ्या मीठाचा महिमा वर्णन करून ठेवलाय. सध्या शाकाहारी अन्नाची मोहीम जोर घेत आहे व काहीकांना अंडय़ाची चव चाखायला मिळत नाही. तेव्हा काळे मीठ त्यांची मानसिक गरज भागवित आहे. त्यामुळे अलिकडे हे `नकटीचे' परदेशातही स्वागत होत आहे.

जर तुम्हाला स्वस्थ, निरोगी आयुष्य जगण्याची इच्छा असेल तर दररोज सकाळी पाण्यात काळे मीठ टाकून ते पिणे सुरु करावे. या मिश्रणाला सोल वॉटर म्हणतात असेही म्हणतात. या पाण्यामुळे तुमची ब्लड शुगर, ब्लडप्रेशर, ऊर्जेमध्ये सुधार, लठ्ठपणा आणि विविध प्रकारचे आजार लवकर ठीक होतील. लक्षात ठेवा यासाठी तुम्ही किचनमधील साधे मीठ उपयोग आणू नका. यासाठी काळे मीठच आवश्यक आहे. या मिठामध्ये 80 खनिज आणि जीवनासाठी आवश्यक असलेले नैसर्गिक तत्त्व आढळून येतात. हे सर्व पोषक तत्त्व शरीरासाठी खूप फायदेशीर आहेत.

एक ग्लास कोमट पाण्यामध्ये अर्धा चमचा काळे मीठ टाका. या ग्लासावर प्लास्टिकचे झाकण ठेवा. त्यानंतर ग्लास चांगल्याप्रकारे हलवून घ्या. त्यानंतर 24 तास हे मिश्रण तसेच ठेवा. 24 तासानंतर मीठ पाण्यामध्ये विरघळले आहे का पाहा. त्यानंतर यामध्ये पुन्हा थोडेसे काळे मीठ टाका आणि हे पाणी प्या.

शरीर करते डिटॉक्स
मिठामध्ये विविध खनिज तत्त्व असल्यामुळे हे अँटीबॅक्टीरियलचेही काम करते. यामुळे शरीरात उपस्थित असलेल्या घातक विषारी तत्वांचा नाश होतो.

काळ्या मिठामधील उपस्थित खनिज तत्त्व आपल्या तंत्रिका तंत्रला शांत ठेवतात. हे मीठ, कोर्टिसोल आणि एड्रनलाईन यासारख्या दोन स्ट्रेस हार्मोनला कमी करते. यामुळे रात्री शांत झोप लागण्यास मदत होते. (मस्तिष्क, मेरुदंड आणि तंत्रिका (नस, शिरा) मिळून तंत्रिका तंत्र बनवतात.)

पाचन तंत्र ठीक राहते
काळ्या मिठाचे पाणी तोंडात तयार होणारी लाळ ग्रंथीला सक्रिय करण्यास मदत करते. उत्तम पाचन तंत्रासाठी हे पहिले पाऊल खूप आवश्यक आहे. पोटामध्ये नैसर्गिक मीठ, हायड्रोक्लोरिक अॅसिड आणि प्रोटीनला पचवणारे किण्वक (एन्जाइम)ला उत्तेजित करण्याचे काम करते. यामुळे खाल्लेले अन्न व्यवस्थित पचते. या व्यतिरिक्त इंटेस्टाइनिल ट्रॅक्ट आणि लिव्हरमध्येसुद्धा एन्जाइमला उत्तेजित होण्यास मदत मिळते. यामुळे अन्न सहजतेने पचते.

हाडांना मजबुती
अनेकांना हे माहिती नसेल की आपले शरीर आपल्या हाडांमधील कॅल्शियम आणि इतर खनिज तत्त्व शोषून घेते. यामुळे आपली हाडे कमजोर होतात. मिठाचे पाणी झालेल्या मिनरल लॉसची पूर्तता करून हाडे मजबूत करण्याचे काम करते.

त्वचेची समस्या -
मिठामधील क्रोमियम तत्व मुरुमांशी लढते तसेच सल्फरने त्वचा स्वच्छ आणि कोमल होते. या व्यतिरिक्त मिठाचे पाणी प्यायल्यास खाज आणि रॅशेसची समस्या दूर होते.

• *काही पालेभाज्यांचे औषधी उपयोग पुढीलप्रमाणे आहेत.*

१.] *कोथिंबीर* :- उष्णता कमी करणारी, पित्तनाशक असते. हृदरोगावर अतिशय उपयुक्त आहे.

२.] *कढीलिंब* ;- पित्तनाशक व कृमीनाशक म्हणून याचा उपयोग होतो.

३.] *पालक* :- मूत्रसंस्था, पचनसंस्था यांच्या आतील सूजेला मऊपणा आणण्यास उपयुक्त असून दमा व खोकला कमी करणारी आहे.

४.] *माठ* :- हृदयाच्या कार्याला उपयोगी असून ही भाजी खाल्यावर शौचाला साफ होते.

५.] *चाकवत* :- ही पचण्याला सुलभ असून ज्वरनाशक आहे. त्वचेला कांती देणारी अशी ही भाजी आहे. ही भाजी कृमीनाशक असून यकृताच्या सर्व विकारांवर उपयुक्त आहे.

६.] *हादगा* :- खोकला, पित्त, हिवताप कमी करणारी ही भाजी आहे. या भाजीच्या फुलाच्या रसाचे दोन थेंब काही दिवस डोळ्यात घातल्यास रातआंधळेपणा नाहीसा होतो असे म्हणतात. हा फुलांचा रस मधातून घेतल्याने छातीतील कफ लवकर सुटतो.

७.] *अळू* :- याच्या पानांचा व दांड्यांचा रस जंतुनाशक आहे. त्यामुळे शरिराच्या कापलेल्या भागावर याचा रस लावून पट्टी बांधल्यास जखमा लवकर भरून येतात. याचा रस साखरेबरोबर दिवसातून दोन-तीन वेळा घेतल्यास मूळव्याध कमी होते.

८.] *अंबाडी* :- मीरपूड व साखर यांच्याबरोबर अंबाडीचा रस प्राशन केल्यास तो पित्तनाशक ठरतो.

९.] *घोळ* :- मूळव्याध कमी करण्यास ही भाजी उपयुक्त आहे. शिवाय ती खाल्ल्यामुळे लघवीला साफ आणि भरपूर होते.

१०.] *टाकळा* :- सर्वांगाला येणारी खाज ही भाजी खाल्याने कमी होते. या भाजीच्या बियांच्या पीठ अशक्तपाणा कमी करण्यास उपयुक्त आहे.

११.] *मायाळू* :- अंगावर पित्त उठले असताना याच्या पानांचा रस आंगाला चोळल्यास पित्त कमी ह्पते. लहानमुलांना थंडी खोकला झाला असताना मायाळूच्या पानाचा रस चमचाभर देतात.

१२.] *तांदुळजा* :- बाळंतीणीला दूध वाढवण्यास ही भाजी उपयोगी ठरते.

१३.] *मेथी* :- सारक व पथ्यकर असलेल्या या भाजीमध्ये लोहाचे प्रमाण बरेच आहे. याचे बी वातहारक व शक्तिकारक असते म्हणून बाळंतपणात याचा उपयोग केला जातो. दूधवाढीसाठीही त्याचा उपयोग होतो. मेथ्यांचे पीठ तोंडाला लावल्यास चेहऱ्यावरील सुरकुत्या नष्ट होतात व चेहरा तजेलदार दिसतो.

१४.] *शेपू* ;- वातनाशक व पोटदुखी कमी करणारी अशी ही भाजी आहे.

१५.] *शेवगा* ;- ही भाजी वातनाशक व पित्तनाशक आहे. हृदय व रुधिराभिसरण क्रिया यामुळे सुधारतात.

१६.] *सॅलड* :- या भाजीमध्ये लेसीथीन नावाचे द्रव्य असते. मजासंस्थेचे कार्य सुधारण्यास त्यामुळे मदत होते. मेंदूवर जास्त ताण पडणाऱ्यांनी नियमित सॅलड खावे

शरीर स्वस्थ व आरोग्यदायी राहण्यासाठी*

(१) ९०% आजार हे पोटातून होतात, पोटात ॲसिडीटी, कब्ज नसला पाहिजे, पोट स्वच्छ, साफ तो आरोग्याचा राजा.

(२) शरीरात न धरता येणारे १३ वेग आहेत. याचा विचार करा.

(३) १६० प्रकारचे रोग फक्त मांसाहाराने होतात हे लक्षात ठेवा.

(४) ८० प्रकारचे आजार नुसत्या चहा पिण्याने होतात. हा आपल्याला इंग्रजांनी दिलेला विषारी डोस आहे.

(५) ४८ प्रकाचे रोग ऐल्युनियम भांडी वापरल्याने होतात.त्यात आपण ही भांडी सर्रास वापरतो. ही भांडी ब्रिटिशांनी आपल्या कैदी लोकांना त्रास होवा म्हणून वापरत.

(६) तसेच दारू, कोल्ड्रिंक, चहा याच्या अति सेवनाने हदय रोग होऊ शकतो.

(७) मॅगिनॉट, गुटका, सारी, डुक्कराचे मांस, पिज्जा, बर्गर, बिडी, सिगारेट, पेप्सी, कोक यामुळे मोठे आतडे सडते.

(८) जेवण झाल्यावर लगेच स्नान करु नये यामुळे पाचनशक्ती मंद होते, शरीर कमजोर होते.

(९) केस रंगवू नका, हेअर कलरने डोळ्यास त्रास होतो, कमी दिसू लागते.

(१०) गरम पाण्याने स्नान करण्याने शरीराची प्रतिकार शक्ती कमी होते. गरम पाणी कधीही डोक्यावरुन घेऊ नये डोळे कमजोर होतात.

(११) स्नान करताना कधीही पटकण डोक्यावरून पाणी घेऊ नका कारण पॅरालिसिसचा, हदयाचा अ‍ॅटक येऊ शकतो. प्रथम पायावर, गुडघ्यावर, मांडीवर, पोटावर, छातीवर, खांद्यावर, पाणी टाकत चोळत पहिल्यांदा स्नान करावे नंतर डोक्यावर पाणी घ्यावे त्यामुळे डोक्यातून रक्तसंचार पाया कडे होता व त्रास होत नाही, चक्कर येत नाही.

(१२) उभ्याने कधीही पाणी पिऊ नये टाच कायमची दुखु लागते.

(१३) जेवताना वरुन कधीही मीठ घेऊ नये त्यामुळे चक्तचाप, ब्लडप्रेशर वाढतो.

(१४) कधीही जोराने शिंकू नये नाहीतर कानाला त्रास होऊ शकतो.

(१५) रोज सकाळी तुळशीचे पाने खावीत कधीच सर्दी, ताप, मलेरिया होणार नाही

(१६) जेवणानंतर रोज जुना गुळ आणि सौफ खावी पचन चांगले होते व ॲसिडिटी होत नाही.

(१७) सतत कफ होत असेल तर नेहमी मुलहठी चोळावी कफ बाहेर पडतो व आवाज चांगला होतो.

(१८) नेहमी पाणी ताजे प्यावे,विहीरीचे पाणी फार चांगले, बाटलीबंद फ्रिज मधले पाणी कधीही पिऊ नये यामुळे नसानसांत त्रास होतो.

(१९) पाण्याने होणारे रोग यकृत, टायफॉइड, शस्त्र, पोटाचे रोग या पासून लिंबू आपल्याला वाचवते.

(२०) गहूचा चीक, गहूचे कोंब खाण्याने शरीराची प्रतिकार शक्ती वाढते.

(२२) स्वैयपाक झाल्यावर ४८ मिनिटाच्या आत खावा नाहीतर त्यातील पोषक तत्वे नाहीशी होतात.

(२३) मातीच्या भांडयात स्वैयपाक केल्यास १००% पोषक, काशाच्या भांडयात स्वैयपाक केल्यास ९७% पोषक, पिताळाच्या भांडयात स्वैयपाक केल्यास ९३% पोषक, अल्युमिनियमच्या भांडयात स्वैयपाक केल्यास ७ ते १३% पोषक असते

(२४) गव्हाचे पीठ १५ दिवस जुने झालेले वापरू नये.

(२५) १४ वर्षाच्या खालील मुलांना मैदयाचे पदार्थ बिस्किटं, सामोसा व इतर पदार्थ खावू घालू नये.

(२६) खाण्यास सैंधा मीठ सर्वश्रेष्ठ त्यानंतर काळेमीठ व नंतर पांढरे मीठ पण हे मीठ फार विषारी असते.

(२७) भाजलेल्या ठीकाणी बटाट्याचा रस, हळद, मध, घृतकुमारी, यातील काही लावले तर थंड वाटते व व्रण पडत नाही

(२८) पायाचा अंगठा सरसूच्या तेलाने चोळल्यास डोळ्याची आग, खाज, लाली बरी होते.

(२९) खाण्याचा चुना ७० प्रकारचे रोग बरे करतो.

• MPSC Science:

जीवनसत्वे व त्याचे स्त्रोत

- सर फ्रेडीरिक गॉवलॅड हॉपकिन नावाच्या शास्त्रज्ञाने जिवनसत्वाचा शोध लावला.
- सजीवांना या पोषणतत्वाची सूक्ष्म प्रमाणात गरज असली तरी, त्याच्या अभावी होणार्या आजाराची परिणामता फार मोठी आहे.
- आपल्याला खालील जिवनसत्वाची गरज असते.

1. सत्व - अ
- शास्त्रीय नांव - रेटीनॉल
- उपयोग - डोळे व त्वचा यांच्या आरोग्याकरिता
- अभावी होणारे आजार - त्वचा, रोग व रात आंधळेपणा
- स्त्रोत - टमाटे, अंडी, यकृत, भाज्या फळे, आवळा, सोयाबीन, मांस

2. सत्व - ब1
- शास्त्रीय नांव - थायमिन
- उपयोग - चेतासंस्थेचे आरोग्य
- अभावी होणारे आजार - बेरीबेरी
- स्त्रोत - धन्य, यीस्ट, यकृत,

3. सत्व- ब2
- शास्त्रीय नांव - रायबोफ्लेविन
- उपयोग - चयापचय क्रियेकरिता
- अभावी होणारे आजार - पेलाग्रा
- स्त्रोत - अंडी, यकृत, मांस, दूध व शेंगदाणे

4. सत्व - ब3
- शास्त्रीय नांव - नायसीन
- उपयोग - त्वचा व केस
- अभावी होणारे आजार - त्वचारोग व केस पांढरे
- स्त्रोत - दूध, टमाटे, उस, यीस्ट, अंडी

5. सत्व - ब6
- शास्त्रीय नांव - पिरीडॉक्सीन
- उपयोग - रक्त संवर्धनाकरिता
- अभावी होणारे आजार - ॲनामिया
- स्त्रोत - यकृत व पालेभाज्या

6. सत्व - ब10
- शास्त्रीय नांव - फॉलीक
- उपयोग - ॲसीडरक्ताचे आरोग्य राखणे
- अभावी होणारे आजार - ॲनामिया
- स्त्रोत - यकृत

7. सत्व - क
- शास्त्रीय नांव - ॲस्कार्बिक, ॲसीड
- उपयोग - दात व हिरड्यांच्या आरोग्याकरिता
- अभावी होणारे आजार - स्कव्हा, हिरड्या सुजणे, हिरड्यांमधून रक्त येणे
- स्त्रोत - लिंबुवगाय फळे, टोमॅटो, आवळा, संत्री, मोसंबी इत्यादि

8. सत्व - ड
- शास्त्रीय नांव - कॅल्सिफेरॉल
- उपयोग - दात, हिरड्या, हाडे व त्वचेचे आरोग्य
- अभावी होणारे आजार - अस्थिचा मृदुपणा, दंतक्षय व त्वचा रोग
- स्त्रोत - मासे, कोर्ड लिव्हर, ऑईल, अंडी सूर्याची कोवळी किरणे

9. सत्व - इ
- शास्त्रीय नांव - टोकोफेरॉल

# वजन कमी करण्यासाठी

- लठ्ठपणा कमी करण्या साठी....

वजन कमी करायचंय.....मग आधी तसे मनात आणा....आणि एकदा मनात असा विचार आणलात की त्यासाठी पुढे जे काही करावे लागेल ते श्रद्धेने एखाद्या व्रताप्रमाणे करा..

लठ्ठपणा म्हणजे अनेक आजारांना निमंत्रण होय. हृदय विकार, उच्च रक्तदाब आदी आजार लठ्ठपणासोबतच येतात. तुमचे वजन तुमच्या उंचीशी साजेसेच असले पाहिजे. लठ्ठपणामुळे संपूर्ण शरीर थुलथुलीत होते. मांसपेशीदेखील ढिल्या होतात. कुल्ले आणि पाठीवर चरबी वाढते. ढेरी पुढे येते. हात आणि मांड्यांच्या ठिकाणीही चरबी साठून राहते.
माहिती संकलन -गजानन वैद whats app-7775871809
1.खाणंपिणं बंद करून शरीरावर अत्याचार करू नका. कमी खाल्ल्यामुळे वजन कमी होईल, असं तुम्हाला वाटत असेल तर हा तुमचा गैरसमज आहे.
2.पोट पूर्ण भरणार नाही एवढेच भोजन 3 वेळा घ्यावे.
नियमीत व्यायाम आणि योगासने करा. शारीरिक श्रम करा.
3.निसर्गाने मनुष्य शरीराची रचना ही मांसाहार पचनासाठी केलेलीच नाही .मांसाहार करू नये.
4.जेवणानंतर कधीही लगेच झोपू नये. शतपावली करणे चांगले. जेवणानंतर येणारी झोप ही खरी झोप नसून ती केवळ सुस्ती असते ज्याने शरीराचा बोजडपणा वाढीस लागतो.
5.कमी कॅलरी आणि अधिक फायबर असणारं खाणं घ्या. सलाडस आणि ताजी फळं नियमितपणे खायला हवीत. सलाड ड्रेसिंग करणं टाळा. कडधान्य, भाज्यांचे सूप्स भरपूर घ्या.
6.चालणं हा उत्कृष्ट व्यायाम आहे. रोज 1 तास जलद चालण्याचा व्यायाम न चुकवता वेळ मिळेल त्या वेळी करावा. तो घरातल्या घरात, रस्त्यावर, ट्रेड मिलवर कुठेही चालेल. रोज किमान ३ ते ४ कि.मी. चालावं.
7.दिवसभरात किमान 3 लिटर पाणी प्या.
8.आठवड्यात एकदा उपवास जरूर करा.
9.उन्हाळ्याचा ऋतू वजन कमी करण्यासाठी सर्वात जास्त अनूकूल आहे. उन्हाळ्यामध्ये आपल्याला चटकन घाम येतो. व त्याचाच फायदा वजन कमी करण्यासाठी होतो.
10.आपल्या आहारावर लक्ष ठेवा. चपाती, भाकरी, भात, साखर, बटाटे आणि मिठाई थोडी कमीच घ्या. याउलट भाजीपाला, फळभाज्या, फळे आणि प्रथिनयुक्त पदार्थ जास्त चांगले. गव्हाच्या पीठात सोयापीठ मिसळून प्रथिनांचे प्रमाण वाढवता येते.
11.दररोज 10 ते 15 मिनिटे हसले पाहिजे. यामुळे 280 कॅलरी उपयोगात येईल आणि तुम्ही तणावमुक्त राहाल. वजन वाढण्याच्या इतर कारणांमध्ये तणाव हे एक कारण आहे.
12.दुपारी झोपण्याची सवय केवळ वजन वाढण्याच्या दृष्टिकोनातूनच नव्हे तर एकूण आरोग्या साठी पण अत्यंत हानिकारक आहे. अशी सवय लागली असेल तर ती तातडतोब सोडावी.
13. महत्त्वाचं म्हणजे आशा सोडू नका. कितीही उपाय केले, तरी वजन कमी होत नाही हे पाहून निराश होण्याची गरज नाही. संतुलित आहार आणि व्यायाम यांच्या माध्यमातून वजन नक्कीच कमी करता येईल. वजन कमी होत आहे की जास्त याकडे फारसे लक्ष देऊ नये.
वरील सर्व नियम पाळले की...मग बघा वजन कसे कमी होत नाही.

चिकित्सक सल्ला घ्यावा.....

# दिनचर्या

- * ŭ निरोगधाम पत्रिका ŭ *
  S जीवनोपयोगी S

1. *सकाळी उठून कोणते पाणी प्यावे?*
उत्तर. - थोड़े हल्के गरम पाणी.

2. *पिण्याचे पाणी कसे प्यावे?*
उत्तर. - घोट-घोट व खाली बसून प्यावे.

3. *जेवण किती वेळा चावून खाणे योग्य आहे?*
उत्तर. - 32 वेळा.

4. *पोट भरून जेवण केव्हा करावे?*
उत्तर. - सकाळी.

5. *सकाळचा नाश्ता केव्हा पूर्यन्त खाऊ शकता?*
उत्तर. - सूर्य उगवण्याच्या अडीच तासापर्यन्त.

6. *सकाळच्या जेवणासोबत नेहमी काय प्यावे?*
उत्तर. - ज्यूस

7. *दुपारच्या जेवणासोबत नेहमी काय प्यावे?*
उत्तर. - लस्सी किंवा ताक.

8. *रात्रीच्या जेवणासोबत नेहमी काय प्यावे?*
उत्तर. - दूध

9. *आंबट फळे केव्हा खाणे योग्य नाही?*
उत्तर. - रात्रीच्या वेळी कधीही खाऊ नये.

10. *आईसक्रीम केव्हा खावी?*
उत्तर. - कधीही नाही.

11. *फ्रिज मधून काढलेले पदार्थ केव्हा खावेत?*
उत्तर. - 1 तासानंतर

12. *शीतपेय प्यावे का?*
उत्तर. - अजिबात नाही.

13. *तयार झालेले जेवण किती वेळेत खावे?*
उत्तर. - 40 मिनिटांत

14. *दुपारचे जेवण किती प्रमाणात करावे?*
उत्तर. - थोड़ी भूक असू द्यावी.

15. *रात्रीचे जेवण केव्हा करणे योग्य आहे?*
उत्तर. - सूर्य मावळण्या आधी

16. *जेवण करण्याअगोदर किती वेळ अगोदर पाणी पिऊ शकता?*
उत्तर. - 48 मिनिटे अगोदर

17. *काय रात्री लस्सी पिऊ शकतो?*
उत्तर. - नाही

18. *सकाळी जेवण केल्यानंतर काय करावे?*
उत्तर. - काम

19. *दुपारच्या जेवनानंतर काय करावे?*
उत्तर. - विश्रांती

20. *रात्री जेवण केल्यानंतर काय करावे?*
उत्तर. - कमीत कमी 500 मीटर एक फेर फटका जरूर मारावा.

21. *जेवण केल्यानंतर नेहमी काय करावे?*
उत्तर. - वज्रासन

22. *जेवण झाल्यावर वज्रासन किती वेळ करावे?*
उत्तर. - 5 -10 मिनिटे

23. *सकाळी उठल्यावर डोळ्यात काय टाकावे?*
उत्तर. - तोंडाची लाळ

24. *रात्री किती वाजन्याच्या आत झोपावे?*
उत्तर. - 9 - 10 वाजे पर्यन्त

25. *तीन विष कोणते?*
उत्तर.- साखर , मैदा व मीठ.

26. *जेवण किती प्रमाणात असावे?*
उत्तर.- जेवण कधीही पोट भरून करू नये.थोडी भूक नेहमी ठेवावी.

27. *रात्री सलाड खावे का?*
उत्तर. - नाही.

28. *जेवण नेहमी कसे करावे?*
उत्तर. - खाली जमिनीवर बसून व व्यवस्थित चावून खावे.

29. *विदेशी पदार्थ खरेदी कराव का?*
उत्तर. - कधीच खरेदी करू नये.

30. *चहा केव्हा प्यायला पाहिजे?*
उत्तर. - कधीच नाही.

# खाना

- Part *1"
  किन चीज़ों को कभी भी एक
  साथ नहीं खाना चाहिए?
  ##################
  कई बार हम हम खाने में ऐसी कई चीजों को एक साथ मिला कर खा लेते हैं, जिससे सेहत को नुकसान होने लगता हैं। आयुर्वेद के अनुसार खाना ऐसा होना चाहिए जिसमे थोड़ा घी हो, वह हल्का हो और थोड़ा गर्म हो।ऐसा भोजन आसानी से पचने वाला माना गया हैं।आइये जानते हैं की किन चीजों को एक साथ मिला कर नहीं खाना चाहिए :-
  खाना खाने के बाद चाय पीना चाहिए या नहीं :-खाना खाने के बाद चाय पीना नहीं चाहिए। यह मिथ हैं की भोजन करने के
  बाद चाय पीने से पाचन बढ़ता हैं।लेकिन आप ग्रीन टी,काहवा या सौंफ, दालचीनी, अदरक आदि की बिना दूध वाली चाय को पी सकते हैं। क्या मछली के साथ दूध पीना चाहिए :- नहीं, मछली के साथ कभी भी दूध नहीं पीना चाहिए । आयुर्वेद के अनुसार अगर आप मछली खाने के बाद दूध पीते हैं तो आपको leukoderma हो सकता हैं। एक ऐसी बिमारी हैं जिससे शरीर पर सफ़ेद चकत्ते पड़ जाते हैं। कभी भी दूध पीने के बाद मछली नहीं खाना चाहिए और इसी प्रकार मछली खाने के बाद भी दूध नहीं पीना चाहिए, इससे आपको स्किन की समस्याओं का सामना करना पड़ सकता हैं। क्या मछली के साथ दही खाना सही रहेगा :- नहीं मछली के साथ दही भी नहीं खानी चाहिए। क्योंकि दही की तासीर ठंडी होती हैं और मछली की तासीर काफी गर्म होती हैं। ऐसे में इन दोनों को एक साथ खाने से आपको
  गैस, एलर्जी और स्किन से सम्बंधित बीमारियाँ हो सकती हैं। दही के अलावा शहद को भी नहीं खाना चाहिए।
  खाना खाते समय पानी पीना सही हैं या गलत :- खाना खाते समय पानी नहीं पीना चाहिए। खाना लम्बे वक़्त तक पेट में
  रहेगा तो ज्यादा पोषण देगा। अगर आप पानी ज्यादा पियेंगे तो खाना तुरंत नीचे चला जायेगा। अगर आपको पानी पीना ही हैं तो इसकी मात्रा कम करे और ठण्डे पानी की जगह थोड़ा गुनगुना या नार्मल पानी ही पिए।
  क्या खाने में लहसुन प्याज को
  शामिल करना चाहिए :-लहसुन और प्याज को अपने भोजन में जरूर शामिल करना चाहिए। लहसुन के सेवन से ख़राब कोलेस्ट्रॉल का लेवल कम होता हैं और गुड कोलेस्ट्रॉल का लेवल बढ़ता हैं। यह बेहतरीन एंटीबायोटिक और एंटीबॉडीज का काम करता हैं। दूसरी ओर प्याज से भूख बढ़ती हैं और खून की नलियों के पास फैट नहीं जमता हैं।
  लहसुन प्याज को
  आप कच्चा या भूनकर कर खा सकते हैं।लेकिन कच्चा लहसुन खाना ज्यादा फायदेमंद होता हैं। S S

# खाना

- Part *2"
  किन चीज़ों को कभी भी एक
  साथ नहीं खाना चाहिए?
  ##################
  दही के साथ फल खाना चाहिए :- फल और दही में अलग-अलग एंजाइम पाए
  जाते हैं। इस वजह से यह हजम नहीं हो पाते हैं। इसलिए इन दोनों को कभी भी एक साथ नहीं खाना चाहिए। फ्रूट
  रायता आप कभी कभार खा सकते हैं, लेकिन इसे बार-बार खाने से बचना चाहिए।
  ठंडा दूध पीना अच्छा हैं की गर्म दूध :- बहुत ज्यादा ठंडा और बहुत ज्यादा गर्म दूध कभी नहीं पीना चाहिए। इसलिए
  आपको थोड़ा सा गुनगुना दूध ही पीना चाहिए। दूध को आप सोने से 1 घंटा पहले पिए, इससे आपको अच्छी नींद
  आएगी क्योंकि इसमें सैरोटोनिन पाया जाता हैं जो दिमाग को शांत करता हैं। हालांकि दूध को हमेशा अकेले ही पीना
  चाहिए। दूध पीते वक़्त इसमें चीनी नहीं मिलानी चाहिए, क्योंकि इससे आपको कफ की शिकायत हो सकती हैं। चीनी
  की बजाये आप शहद या मुनक्के का इस्तेमाल कर सकते हैं। दूध के साथ तला-भूना खाना चाहिए :- दूध में मिनरल्स,
  विटामिन, लेक्टोस, शुगर और प्रोटीन पाए जाते हैं। दूध एक एनिमल प्रोटीन हैं उसके साथ तली भूनी चीजों को खाने
  से रिएक्शन हो सकता हैं। दूध के साथ नमक और नमकीन वाली चीजों को नहीं खाना चाहिए। नमक के मिलने से
  मिल्क प्रोटीन जम जाता हैं और उसके न्यूट्रीएंट्स में कमी आ जाती हैं। अगर
  आप लम्बे वक़्त तक दूध के साथ नमकीन चीजों का सेवन कर रहे हैं तो आपको स्किन के रोग भी हो सकते हैं। उड़द
  की
  दाल खाने के बाद भी दूध नहीं पीना चाहिए। तिल के साथ भी दूध नहीं लेना चाहिए।
  कार्बोहायड्रेट के साथ प्रोटीन खाना चाहिए या नहीं :- पनीर, मीट, अंडे और नट्स जैसे प्रोटीन के साथ ब्रेड, आलू, दाल
  जैसे कार्बोहाईड्रेट का सेवन नहीं करना चाहिए। क्योंकि प्रोटीन को पचाने
  के लिए जब एंजाइम एक्टिवेट होते हैं तो यह एंजाइम कार्ब्स को पचाने वाले एंजाइम को रोक देते हैं, इससे इन्हें पचाने
  में मुश्किल का सामना करना पड़ता हैं। अगर लगातार इन्हें एक साथ खाया जाये तो आपको कब्ज़ भी हो जाएगी।
  दूध के साथ फल फ्रूट खाने चाहिए या नहीं :- दूध के साथ फल कभी नहीं खाने चाहिए क्योंकि जब आप फल को दूध
  के साथ खाते हैं तो दूध में मौजूद कैल्शियम फलो के एंजाइम को सोख लेता हैं और फलो से मिलने वाला पोषण
  आपके शरीर को प्राप्त नहीं हो पाता हैं। संतरा, चेरी, अनानास और खट्टे फलो के साथ कभी भी दूध नहीं पीना
  चाहिए। व्रत के दिनों में लोग केला खा कर दूध पी लेते जो की सही नहीं हैं। क्योंकि दूध और केला दोनों ही कफ को
  बढ़ाने वाले होते हैं। दोनों को एक साथ खाने से कफ़ में बढ़ोतरी होती हैं और पाचन भी सही तरह से नहीं हो पाता। S
  S

# दही

- कहते हैं-

जो खाए चना वो रहे बना
जो पीवे दही, वह रहे सही

देसी गौ माता के दुध से बना दही है वरदान-----

* दही हमारे पाचन तंत्र को सेहतमंद बनाए रखने में बहुत ही कारगर सिद्ध होता है। रात में दही नहीं खाते हैं।

* दही में सुपाच्य प्रोटीन एवं लाभकारी जीवाणु होते हैं, जो क्षुधा को बढ़ाने में सहायता करते हैं।

* दही का स्वास्थ्य के साथ-साथ सौंदर्य निखारने में भी महत्वपूर्ण स्थान है। चेहरे की त्वचा और बालों पर दही लगाने से लाभ मिलता है।

* दही चेहरे, गर्दन व बाजू आदि के सौंदर्य को तो निखारता ही है, साथ ही यह बालों को पोषण देने में भी बहुत सहायक है।

* दही के नियमित सेवन से आंतों के रोग और पेट की बीमारियां नहीं होती हैं तथा कई प्रकार के विटामिन बनने लगते हैं। दही में जो बैक्टीरिया होते हैं, वे लैक्टोज बैक्टीरिया उत्पन्न करते हैं।

* दही में हृदय रोग, हाई ब्लड प्रेशर और गुर्दों की बीमारियों को रोकने की अद्भुत क्षमता है। यह हमारे रक्त में बनने वाले कोलेस्ट्रॉल नामक घातक पदार्थ को बढ़ने से रोकता है जिससे वह नसों में जमकर ब्लड सर्कुलेशन को प्रभावित न करे और हार्ट बीट सही बनी रहे।

* दही में कैल्शियम की मात्रा काफी पाई जाती है, जो हमारे शरीर में हड्डियों का विकास करती है। दांतों एवं नाखूनों की मजबूती एवं मांसपेशियों के सही ढंग से काम करने में भी सहायता करती है।

* दही के सेवन से शरीर की फालतू चर्बी कम करने में सहायता मिलती है।

* नींद न आने से परेशान रहने वाले लोगों को दही व छाछ का सेवन करना चाहिए।

* दही में बेसन मिलाकर लगाने से त्वचा में निखार आता है। मुंहासे दूर होते हैं।

* दही में शहद मिलाकर चटाने से छोटे बच्चों के दांत आसानी से निकलते हैं।

ॐ जय गौ राम ॐ
ॐ जय गौ शाम ॐ

# लकवा

- लकवा (Paralysis) का उपचार :

लकवा (Paralysis) को आयुर्वेद में पक्षाघात बीमारी भी कहते हैं। इस बीमारी में मरीज़ के एक तरफ के सभी अंग काम करना बिलकुल बंद कर देते हैं जैसे बाएं पैर या बाएं हाथ का कार्य न कर पाना। साथ ही इन अंगों की दिमाग तक चेतना पहुंचाना भी निष्क्रिय यानि बंद हो जाता है| और इस बीमारी की वजह से अंगों का टेढापन, जिश्म में गरमी की कमी, और कुछ याद रखने की क्रिया भी खत्म हो जाती है। आयुर्वेद में लकवा (Paralysis) के प्रभाव को कम करने के अनेक उपचार एव उपाय दिए गए हैं।

लकवा (Paralysis) से बचने के आयुर्वेदिक उपचार :
1. नाशपाती, सेब और अंगूर का रस बराबर मात्रा में एक ग्लिास में मिला लें। और इसे मरीज को लगातार देते रहें। कुछ समय तक यह उपाय हर रोज़ करना है तभी फायदा मिलेगा।
2. सौंठ और उड़द को पानी में मिलाकर हल्की आंच में गरम करके मरीज को हर रोज पिलाने से लकवा ठीक हो जाता है।
3. कुछ दिनों तो रोज छुहारों को दूध में भिगोकर मरीज को देते रहने से लकवा (Paralysis)
धीरे धीरे ठीक होने लगता है।
4. एक चम्मच काली मिर्च को पीसकर उसे तीन चम्मच देशी घी में मिलाकर लेप बना लें और लकवा (Paralysis) ग्रस्त अंगों पर इसकी हर रोज मालिश करें। ऐसा करने से लकवा (Paralysis) ग्रस्त अंगों का रोग जल्द दूर हो जाएगा।
5. करेले की सब्जी या करेले का रस को हर रोज खाने अथवा पीने से लकवा
(Paralysis) से प्रभावित अंगों में सुधार होने लगता है। यह उपाय रोज करना चाहिए।

6. प्याज खाते रहने से और प्याज का रस का सेवन करते रहने से लकवा (Paralysis) मरीज जल्द ठीक हो जाता है।
7. 6-7 कली लहसुन को पीसकर उसे 1 चम्मच मक्खन में अच्छे से मिला लें और रोज इसका सेवन करें। लकवा (Paralysis) में बहुत लाभ मीलता है
8. तुलसी के पत्तों, दही और सेंधा नमक को अच्छे से मिलाकर उसका लेप करने से भी लकावा जल्द ठीक हो जाता है। ये उपाय आपको लंबे समय तक करना होगा।
9. गरम पानी में तुलसी के पत्तों को उबालें और उसका भाप लकवा (Paralysis) ग्रस्ति अंगों को लगातार देते रहने से लकवा (Paralysis) ठीक होने लगता है।
10. 500 ग्राम सरसों के तेल में 50 ग्राम लहसुन डालकर लोहे की कड़ाही में ठीक से पका लें। जब पानी जल जाए उसे ठंडा होने दें फिर इस तेल को छानकर किसी एक डिब्बे में रख लें। और इस तेल से लकवा (Paralysis) वाले अंगों पर हर दिन 2 बार मालिश करें।

लकवा (Paralysis) का सही समय पर इलाज न होने से मरीज एक अपंग की जिंदगी जीने को मजबूर हो जाता है या तो दुसरे पर निर्भर हो जाता है इसलिए समय से पहले लकवा (Paralysis) जैसे गंभीर बीमारी का इलाज करना बहुत जरूरी है।
आयुर्वेदिक तरीको से लकवा (Paralysis) पूरी तरह से ठीक किया जा सकता है।
ये उपाय लंबे समय तक लगातार करने से ही आपको फायदा देगा । इसलिए आपको धैर्य रखना बहुत जरूरी है।

# आवळा

- *आवळा वृक्ष - अमृत*- फळांचा राजा तर आंबा असेल तर सम्राट आहे आवळा. आवळा एक सर्वगुणसंपन्न फळ आहे, आरोग्य, आनंद आणि संपन्नता देणारे. आरोग्यलक्ष्मीने संपन्न तोच खरा श्रीमंत, देश जर महासत्ता होणार असेल तर इथल्या लोकांचे आरोग्य उत्तम असायला हवे. आवळा आरोग्य देतो, आरोग्याचे रक्षण करतो आणि वर्धनही करतो. एका छोट्या फळात स्वास्थ्याचे सार सामावलेले आहे. सौंदर्य आणि तारुण्य देणारा आवळा व त्याचे गुणवर्णन करताना शब्द अपुरे पडतात. देशात आवळा जीवनशैली, आवळा संस्कृती जर विकसित झाली तर औषधाचे कारखाने, पंचतारांकित दवाखाने बंद पडतील. संपूर्ण जगाला निरायम, रोगमुक्त करण्याचे सामर्थ्य आवळ्यामध्ये आहे. शक्ती,. स्फूर्ती आणि तेज देणारा आवळा अनंत हस्ते द्यायला तयार आहेत!

आवळ्यांची संस्कृत नवे पाहिली तर आवळ्यांचे महत्व प्राचीन काळी कसे वैज्ञानी जाणले होते हे समजते. आवळ्यांच्या झाडाला लक्ष्मी म्हणतात. लक्ष्मी पूजनात आवळा पूजेत असतो, लक्ष्मीला तो प्रिय असतो. आवळ्याचे झाड कधीही तोडत नाहीत. आवळा वृक्ष हा कल्पवृक्ष आहे. आवळ्याला अमृतफळ म्हणतात. ते अमरत्व देणारे आहे, अमलक म्हणजे मळ दूर करणारे आहे, आवळ्याला पंचरस म्हणतात. त्यात मधुर तिक्त, कशाय, कटू, आम्ल असे पाच रस असतात. आवळ्याला धरती मत म्हणतात. मातेप्रमाणे आवळा आपले पालनपोषण करतो. आवळ्याला तृष्णा म्हणतात. त्याने तहान भागते. शिवे म्हणतात, ते कल्याणकारी पवित्र फळ आहे. आवळ्याला रोचनी, दिव्या, शक्ती, साधू फळ अशी त्याच्या महान गुणांना अनुसरून नवे आहेत. आवळ्याला वयस्थ म्हणतात. कारण ते बाल्य, तारुण्य टिकवते. त्याला कायस्थ म्हणतात. कारण त्याने शरीर सतेज सुदृढ होते. आवळा अमृतफळ अमरत्व देणारा आहे. आवळा सर्व काही देणारा आहे.

क जीवनसत्वाचा आवळा खजिना आहे, मूर्ती लहान पण कीर्ती महान. सर्व फळांमध्ये क जीवनसत्व संपन्न आहे. रक्त तयार करणारे व शुद्ध करणारे लोह, हाडे, दात मजबूत करणारे, कयल्शियम, बुद्धी स्मरणशक्ती वाढविणारे फॉस्फरस डोळ्यांच्या आरोग्यासाठी सिलिकॉन, रक्त मास, हाडे, स्वच्छ करण्यासाठी क्लोरीन, रोगप्रतीकारासाठी पोटयशियम, प्रतिकारशक्ती, वाढविणारी जीवनतत्वे क ब त्यात असतात. ग्लुकोजचे जोम, उत्साह वाढतो. आवळा उत्तम अल्कली आहे. तो तंतुमय, रसमय असतो. अत्यंत स्वच्छ नेटक्या सुंदर आकाराचे फळ. तारुण्य माणसाच्या जीवनातील सर्वात सुंदर अवस्था पण चिरतारुण्य अशक्यच आपले जीवन ही वार्धक्याकडे जाणारी निरंतर चालणारी प्रक्रिया आहे. तारुण्य म्हणजे उमेद, उत्साह, तेजस्वी डोळे, सुंदर केस, गुलाबी त्वचा, च्यवन ऋषींनी आवळयापासून च्यवनप्राश वयाच्या सत्तराव्या वर्षी तयार केले. त्याच्या सेवनाने ते तरुण झाले. आधी दूर झाल्या. बुद्धी, स्मृती, कांती, शांती विकसित झाली.

नको रे बाबा ते वार्धक्य ! तोंडाचे बोळके, नन्ना वाढणारी मान, डोक्यावरचे शेत पिकलेले किंवा उजाड झालेले, छातीत कफ दाटलेला, हातापायात प्राण नाही. सुरकुतलेला चेहरा, हातात काठी, कंपवात वाटणारा आवाज, डोळ्याने दिसत नाही, कानाने ऐकू येत नाही, त्यात परावलंबित्व, वृद्धावस्था म्हणजे न केलेल्या गुन्हाची सजाच. मृत्यूची चाहल. वार्धक्याचे संशोधन जगभर चालू आहे. पेशींचा नाश होतो. विभजनाचा वेग मंदावतो. प्रतिकारशक्ती कमी होतो. अनेक रोगींचे आश्रयस्थान शरीर होते. झीज होते. शरीर म्हणजे म्हाताऱ्या पेशींची कचरापेटी होते. लवचिकपणा जातो, सर्व संस्था अकार्यक्ष म होतात. मेंदूतील पेशी मेल्याने स्मरणशक्तीचा ह्रास होतो. तोल संभावना येत नाही. मेंदूचे वजन कमी होते. स्नायू अकार्यक्षम होतात. हाडे ठिसूळ होतात. फुफ्फुसाची कार्यक्षमता कमी झाल्याने प्राणवायू अपुरा पडतो. जरी कान आणि डोळे ठीक असले तरी त्यांनी रक्त पुरवठा होत नाही. त्यामुळे त्यांचे कार्य ठप्प होते.दंताजीचे ठाणे उठल्याने बोबडे शब्द येतात. पण आवळा चिरतारुण्य देऊ शकतो. मानसिक आरोग्य तर वृद्धापकाळात फारच ढासळते. कफ, वात, पित्त तीनही विकारांचा त्रास होतो. रोज काहीना काही दुखते. एक वृद्ध तर म्हणाले – ज्या दिवशी आपले काही दुखदार नाही त्या दिवशी आपण खुशाल समजावे की आपण मेलो आहोत. रोगांची मालिका मागे लागते, ते सगळे राक्षस सगळे तुटून पडतात. संधिवात मधुमेह, पक्षाघात, काचबिंदू, हृदयविकार, मानसिक रोग, ककरोग, अल्झायमर, स्मृतिभंग वगैरे तर फार भयानक, मेंदूवरच्या सुरकुत्या कमी होत जातात. आश्चर्य आणि अतिशयोक्ती वाटेल पण खरोखर आवळा या सर्वांपासून आपले रक्षण करतो. डोक्याच्या केसापासून पायाच्या नखांपर्यंत प्रत्येक अवयवाचे आरोग्य त्याचा रक्षक आहे. आवळा पित्तामुळे उलटी, ओकारी होत असेल तर मध, आवळा चाटण उपयुक्त ठरते. मधुमेह या किचकट विकारात आवळा, हळद चूर्ण घ्यावे. त्यामुळे इन्शुलिनची मात्रा वाढते, इ न्जक्शनचे प्रमाण कमी होते. रक्तशर्करा घटते. डोकेदुखी अनेक कारणांनी प्रत्येकाला भेटते. त्यावर आवळा गुणकारी आहे. विषबाधा, व्यसनाचे दुष्परिणाम आवळ्याने कमी होतात. लठ्ठपणावर अविळा उपयुक्त आहे. औवळा कायापलट करून तुम्हाला नवतारुण्य देईल.

स्त्रियांची गर्भावस्था, बाळंतपण, ऋतुमती अवस्था, पाठदुखी, मेनोपॉज सगळ्यात आवळा गुणकारी असून मातेच्या ममतेने तिचे रक्षण करतो. अंगाला खाज सुटल्यावरही उपयुक्त आहे. लहान बाळालाही आवळा रस द्यावा. आवाज बसला असेल तर आवळ्याचे पाणी प्यावे. आवळ्याचे झाड्याचे साल्ही कित्येक रोगांवर उपयुक्त आहे. तोंडाची चव,अन्नावरची वासना गेली असेल तर आवळा खावा. अगदी एड्स, क्यन्सरवरही आवळा पूरक उपचार आहे. मानसिक आजार, फिट्स येण्यावरही आवळा मदतीला येतो. सर्व प्रकारचे मूत्रविकार तो दूर करतो. पचनक्रिया सुधारून बद्धकोष्ट दूर करतो. ग्यसेस होऊ देत नाहीमेंदू ताजातवाना करतो. डोके ठिकाणावर ठेवायला आवळा उपयुक्त आहे. जंत, कृमी, जंतुसंसर्ग आवळ्यामुळे कमी होतो. वार्ध्यक्याची विकृती, विकलांगता आवळ्याने दूर होते, चोर पावलांनी वार्ध्यक्य येते यावर आवळा नियंत्रण ठेवतो. आवळा हा एकट्यानेच युद्ध लढणारा सरसेनापती आहे. झीज भरून काढणे, चयापचयाला चालना देण्याचे काम तो करतो. प्रतिकारशक्ती वाढते. निषिद्ध आहार, सुस्त जीवनशैली, कृत्रिम जीवनमान यामुळे तारुण्याला वृद्धत्व येत आहे. लहान मुलांचे अभ्यासात लक्ष लागत नाही, बैठक नसते, वृत्ती चंचल असते, मन एकाग्र होत नाही, त्यावर त्यांनी सकाळला मोरावळा खायला द्यावा. तुम्ही फक्त आवळ्यावर विश्वास ठेवायला हवा. आयुर्वेदात तर आवळी बांधून त्यात निवासाचा उपाय दिला आहे. बालदमा, श्वास लागणे, सर्दी, कफ, उलट्या, जुलाब, दात देणे या सर्वांवर आवळा उपयोगी आहे. आवळा अलजोक प्रकृती कमी करतो. दिव्यदृष्टी सतेज कांती देणारा आवळा उंची वाढवितो, शरीर दणकट, कणखर करतो.

एका आवळ्यात सगळे ब्युटी पार्लर सामावलेले आहे. तुम्हाला तरुण तर आवळा करेलच पण अनोखे सौंदर्य, व्यक्तीत्वही देईल. तेही कुठलेही साईडइ फेक्ट्स नाहीत अगदी स्वस्तात. चेहऱ्याची डागडुजी रंगरंगोटी करण्याची वेळ येणार नाही. आवळा कमालीचा सफाई कामगार आहे. तो रक्तशुद्धी आणि वृद्धी करतो. त्वचा स्वच्छ व सुंदर बनवितो, शरीरातील घाण निपटून टाकतो, शरीरातील घाण निपटून टाकतो, शरीरातून. हलकासा सुगंध बाहेर पडेल. ती क्रीम्स, ती परफ्युम्स, ती लाली हे महागडे काहीही नको. चेहऱ्यावरच्या सुरकुत्या, काळी वर्तुळे आवळा दूर करतो, केस काळेभोर, चमकणारे,लांबसडक,दाट, मऊसूद करतो, ते गळत नाही.तुमचे दात तुमची शान असते. दंतविहीन सुंदर व्यक्ती कुरूप वाटते. दातांना येणारी दुर्गंधी, कीड, सूज, कीटण यापासून आवळा तुम्हाला मुक्त ठेवतो. आवळा पावडरने दात घासले तर मुखवासाची गरज नाही. निरोगी, शुभ्र, चमकणारे दात होतील. वेदना होणार नाही. डेंटिस्टचा भयानक खुर्चीवर बसायची वेळ येणार नाही. आवळे चावून खाणे. त्याचा काढा पिणे, आवळ्याच्या रसाने मालिश, पाण्याने गुळण्या आवळा चूर्ण खाण्याने दात निरोगी होतात. देशाचे रक्षण करणाऱ्या जवानांना ताज्या फळे मिळत नाही. त्यांना स्कव्ही रोग होते. अशावेळी आवळ्याचे चूर्ण काम करते, तोंड येणे, कडू होणे, चेहऱ्यावर मुरूम येणे, उचकी, तहान लागले, उलटी, मळमळ, खोकला, सर्दी सर्वांसाठी आवळा उपयोगी आहे. केसाला टक्कल पडले तर आवळा रसाने मालिश करा. उवा झाल्या तर आवळाचूर्ण+लिंबू+मेंदीची पाने वाटून लावा. लोखंडी भांड्यात ठेवून सकाळी लावा, त्यात जास्वंद पावडर, मेंदूर पूड घाला आणखी गुण येईल. आवळा केशतेलाने हे काळे केस तुम्ही चमकदार ठेऊ शकता. सर्व सौंदर्य प्रसाधनात आवळा हा असतोच. कुठलीही जखम झाल्यास आवळा उत्तम जंतुनाशक आहे. कडीसाखरा त्वचाविकारही आवळ्याने बरा होतो. निस्तेज त्वचा असेल तर तीळाच्या तेलात आवळा पावडर कालवून टाका. या ना त्या कारणाने ताप आल्यास आवळाचूर्ण, काढा गुणकारी ठरतात. अकाली वृद्धत्वावर आवळा रामबाण उपाय आहे. रक्तातले दोष आवल्याने दूर वाटणारे आजार मृत्युदूत होतात, त्यावरही आवळा उपयुक्त आहे. परीक्षेला जाताना मोरावळा खाल्लाने पोटात खड्डा करणे, ब्लंक होणे, धडधडणे कमी होते. हिरडा, बेहडा, आवळा यांचे त्रिफळाचूर्ण तर वैधच आहे. शल्यचिकित्सेत जखमा भरून येणे, हाडे सांधणे, रक्त वाढविणे, त्वचा पूर्ववत करणे. अशा कामात आवळा मित्र मदत करतो. आंबट असल्याने वात नष्ट होतो. मधुर रस पित्ताचा नाश होतो. मधुर रस पित्ताचा नाश करतो, कटू तुरट रसकफाचा नाश करतात. थकवा, मरगळ, ग्लानी आवळा दूर करतो. अन्नपचनासाठी तर आवळा उत्कृष्ट आहे. आवळ्याचे झाड पर्यावरण शुद्ध करते. सत्त्व, रज, तम हे मनोबुद्धीचे गुणदोष आहेत. त्यांचा समतोल आवळा राखतो. शरीरव्याधीतून मनाची व्याधी असे चक्र आहे. आवळी भोजनाला महत्व आहे. आवळ्याच्या वनात शुद्ध हवा असे असते. जीवजंतूना कित्येक कोस दूर पळवते. अल्झायमर, पार्किन्सन्स या रोगांवर आधुनिक वैधकाला उपाय सापडलेला नाही. पण आवळ्यावर संशोधन केल्यास तो उपाय होऊ शकेल.

आहार नियंत्रण, विहार नियमित असणे, सतत व्यस्त राहणे ही दीर्घायुष्याची गुरुकिल्ली आहे. रोज एक आवळा खाणे म्हणजे आरोग्य धनात भर तोकनेच आहे. शरीरातले विष, न पचलेले पदार्थ आवळा बाहेर टाळतो. झोप, गुंगी आवळा दूर करतो. वार्धक्यात जीवनेच्छा वाढवितो. आवळ्याचे अवलेह कल्प, चूर्ण, रसायन, धृत असे प्रकार असते. ते घरीही करता येतात. च्यवनप्राशमध्ये सर्व औषधी, साजूक तूप, उत्तम प्रतीचा आवळा नसतो, सुकलेले आवळे वापरतात. डोळ्यातील मोतीबिंदू, रातआंधळेपणावर आवळा उपयोगी आहे. आवळ्याचे चूर्ण जखमेवर टाकल्याने रक्तस्त्राव थांबतो, टाके लवकर भरून येतात. दारूचे व्यसन सोडवायला आवळी उपयोगी असतो. वंध्यत्व, गर्भाशयातील दोष, गर्भपात यावरही आवळयासंकट तयार केलेले फळधृत उपयोगी ठरलेले आहे. संजीवनी वटी, त्रिफळा मोदक, काढा, सप्तगुण तेल ही आवळ्यापासून तयार केलेले औषधे उपयुक्त आहेत. आवळा आहाराचा पर्यायाने जीवनाचा भाग व्हावा यासाठी विविध प्रकारे आवळ्याचा उपयोग रोजच्या स्वयंपाकात पाककृतीत करता येतो. आवळा मित्र आहे, धोबी आहे ,परोपकारी संत आहे, जादुगार आहे, आवळ्याला आपलेले केले तर तो आरोग्य, यश, ज्ञान, चैतन्य सर्व देईल. ताणतणाव, भय, असुरक्षितता दूर करेल. आवळा रोगप्रतिबंधक आहे. रोग झाल्यास रोगमुक्ती देणारा आहे. रोग बरा झाल्यावर शक्ती देतो.

आवळ्याचे झाड शेकडो वर्षे आवळे देत राहते. ते स्वतः दीर्घायुषी, चीततरून असते. एकावेळी कित्येक क्विंटल आवळे येतात, सर्व प्रकारच्या जमिनीत आवळा येतो, हवामानाचीही फारशी अट नाही, परदेशात फक्त आवळ्याचाच शास्त्रशुद्ध अभ्यास होऊन स्वीकार झाला आहे. आवळा शिजवला, वालवळा तरी त्यातले सी व्हिटयमिन नष्ट होत नाही. महागडी औषधे त्यांचे साईड इफेकट्स सहन करण्यापेक्षा आवळा कितीतरी श्रेष्ठ, मृत्युंजय आवळा आरोग्यदायक जीवन आणि मरणही देतो, शरीररूपी चादर न मळवता, झिजवता आपल्याला परत द्यायची आहे.

निरोगी, अव्यंग शरीर,बऱ्यावाईटाचा विवेक असलेली बुद्धी परमेश्वराने दिली आहे या देणग्या लाख मोलाच्या आहेत. आवळ्यात अलिबाबाच्या गुहेतला खजिना लपला आहे, निसर्ग फार उदार आहे, शरीर निसर्गाचा भाग आहे. त्याला निसर्गातील औषधांचाच उपयोग होतो. अंघोळीच्या पाण्यातला आवळा, साबणाचे काम नैसर्गिकरित्या करतो. आवळा उटणे वापरावे. आवळा वागवून, खारवून(मीठ लावून) पाकवून, रसायनांचा वापर करून, निर्जंतुक करून, पाश्चराइज करून निर्जंतुक, टिकावू करता येतो. पूर्वी मातीच्या भांड्यात वर्षानुवर्षे पदार्थ टिकत असते, आता आधुनिक पद्धतीचा वापर करायला हवा. आवळा व्रत घ्यायला हवे.

आवळ्याच्या मोरावळा तीन – चार प्रचारांनी करता येतो, आवळा जेली, ज्युस, सरबत, लस्सी करता येते. आवळा लोणचे चार – पाच प्रकारचे होऊ शकते, चटणीही नारळ,धने मेथ्या वगैरे घालून तीन – चार प्रकारची असते. आपण स्वत: प्रयोगाने त्यात भर घालू शकतो. आवळा चोकलेट, क्यंडी करता येते. आवळा सुपारी करता येतो. उकडून – वाळवून, किसून आले कीस मिसळून होते. आवळा लाडू, बर्फी, खोबऱ्यात घालून करता येते. गुलकंदात आवळा घालता येतो, गुळाचा मुरंबा, पाचकवडी करता येते. गुलकंदात आवळा घालता येतो, गुळाचा मुरंबा, पाचकवडी करता येते, सॉस, कोशिंबीर इतकेच नाही तर आवळी पुलाव, पापड, बटाटा मिक्स मिक्स, भाजी छोले, आवळा चहा, आवळा सूप, थंड पेये, अगदी आवळी चिवडाही करता येतो. आवळामय जीवन हे निरामय ,सुखी जीवन असेल.

१ ते ३५ सर्व औषधी ०. ०४०(काष्टोषधीतून आणाव्यात) मधुमेह्यासाठी मध, खडीसाखर न घालता च्यवनप्राश करता येतो.

कृती:आवळे ताजे, पांढरी रेष, पिवळ्या रंगाचे, घट्ट, गोल आकाराचे निवडावे. सर्व वनस्पति थोड्या कुटून स्टीलच्या भांड्यात वीस लिटर पाण्यात भिजत ठेवाव्यात. पातेले चुलीवर ठेवावे, पातळ पण मजबूत पिशवीत आवळे ठेवून पिशवीचे तोंड बांधून ती पातेल्यात टाकून सर्व चांगले शिजवावे. पाणी शिल्लक राहिल्या व आवळे ठेवून पिशवीचे तोंड बांधून ती पातेल्यात टाकून सर्व चांगले शिजवावे. पाणी शिल्लक राहिल्या व आवळे बाजूला घ्यावे. बाकीचा काढा गालावा. आवळ्यातल्या बिया काढून गर तूप व तिळाचे तेलात परतावा, त्यात गाळून ठेवलेल्या काढा घालावा, त्यात गेडीसाखर टाकून मिश्रण आटावावे, घट्ट झील्यावर उतरवून निवल्यावर त्यात वंशलोचन, पिंपळी, दालचीनी, वेलची, तमालपत्र, नागकेशराचे वस्त्रगाळ चूर्ण टाकावे, एकजीव होईपर्यंत घोटावे म्हणजे च्यवनप्राश तयार होईल.

मधुमेह नसल्यास साखरेचे प्रमाण वाढवल्याने च्यवनप्राश जास्त चविष्ट होईल. च्यवनप्राश रोज चमचाभर अनशापोटी गाईचे दुधाबरोबर घ्यावा नंतर दोन तास काहीही खाऊ नये.

